मौजे कापशी, ता.कागल, जि.कोल्हापूर येथे सरसेनापती संताजी घोरपडे यांचे स्मारक उभारण्यासाठी निधी वितरीत करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन

ग्राम विकास विभाग

शासन निर्णय क्रमांकः स्मारक-२०२०/प्र.क्र.७७/योजना-११

बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ

फोर्ट, मुंबई-४०० ००१.

दिनांक : - ३० मार्च, २०२२.

वाचा :

१) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र.स्मारक-२०१६/प्र.क्र.०३/पंरा-९, दि.११ ऑगस्ट, २०१६.

२) शासन निर्णय, ग्राम विकास विभाग, क्र.स्मारक-२०२०/प्र.क्र.७७/योजना-११, दि.२८.०२.२०२०.

३) शासन निर्णय, ग्राम विकास विभाग, क्र.स्मारक-२०२०/प्र.क्र.७७/योजना-११, दि.२४.०६.२०२१.

४) शासन निर्णय, ग्राम विकास विभाग, क्र.स्मारक-२०२०/प्र.क्र.७७/योजना-११, दि. ४ मार्च, २०२२.

प्रस्तावना :

जिल्हाधिकारी, कोल्हापूर यांनी दिनांक ४.३.२०२० च्या पत्रान्वये, सरसेनापती संताजी घोरपडे यांचे मौजे कापशी, ता.कागल, जि.कोल्हापूर येथे स्मारक बांधकामासाठी रु.९१६/- लक्ष (अक्षरी रुपये नऊ कोटी सोळा लक्ष फक्त) इतक्या रकमेचा प्रस्ताव सादर केला असता, सार्वजनिक बांधकाम विभागाने रुपये ६७५.७१ लक्ष (अक्षरी सहा कोटी पंच्च्याहत्तर लक्ष एकाहत्तर हजार फक्त) इतक्या प्रकल्प किंमत व अंदाजपत्रकास सहमती दर्शविल्यामुळे रुपये ६७५.७१ लक्ष इतक्या रकमेस प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. त्यानुषंगाने सदरहु स्मारकास निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :

सरसेनापती संताजी घोरपडे, यांचे मौजे कापशी, ता.कागल, जि.कोल्हापूर येथे स्मारक बांधकामाचा रुपये ६७५.७१/- लक्ष (अक्षरी सहा कोटी पंच्च्याहत्तर लक्ष एकाहत्तर हजार फक्त) इतक्या रकमेचा आराखडा व अंदाजपत्रकास संदर्भाधिन दि.२४.६.२०२१ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली असून सदरहू स्मारकास संदर्भाधिन दि.४.३.२०२२ च्या शासन निर्णयान्वये रु.६७५.७१/- इतका निधी वितरीत करण्यात आलेला आहे. परंतु वित्त विभागाने अर्थसंकल्पीय सुधारित अंदाजपत्रकान्वये १.०० कोटी (रु.एक कोटी) इतकी तरतूदीच्या ५०% रुपये ५०.०० लक्ष इतका निधी उपलब्ध करुन दिलेला असल्याने संदर्भ क्रमांक-४ येथील दिनांक ४.३.२०२२ चा शासन निर्णय रद्द

करण्यात येत असून सदरहू स्मारकाच्या प्राथमिक बांधकामासाठी रुपये ५०.०० लक्ष (रु.पन्नास लक्ष) इतका निधी अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर (BDS) वितरीत करण्यात येत आहे.

३. सदर स्मारकाच्या बांधकामावरील खर्च भागविण्याकरिता जिल्हा नियोजन अधिकारी, कोल्हापूर यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून जिल्हाधिकारी, कोल्हापूर यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर स्मारकावरील खर्चाची जबाबदारी जिल्हाधिकारी, कोल्हापूर यांची राहील. त्यांनी सदर स्मारकाचे बांधकाम कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, कोल्हापूर यांच्याकडून करुन घेण्याची कार्यवाही करावी. तसेच स्मारकाच्या कामाची प्रगती तसेच उपयोगिता संबंधिची माहिती, उपयोगिता प्रमाणपत्र वेळोवेळी शासनास सादर करावे व महालेखापालांच्या लेख्याशी खर्चाच्या ताळमेळाबाबतची कार्यवाही करावी. तसेच विहीत कालावधीत निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी.

४. सदर स्मारकाच्या बांधकामावर नियंत्रण ठेवण्याची व कोणत्याही प्रकारची अनियमितता होणार नाही याबाबतची जबाबदारी जिल्हास्तरीय स्मारक समितीची राहील.

५. सदरहू खर्च सन २०२१-२२ करिता लेखाशिर्ष-मागणी क्रमांक-एल-३, २५१५-इतर ग्राम विकास कार्यक्रम, १९६ जिल्हा परिषदांना / जिल्हास्तरीय पंचायतीना सहाय (००) (०६) थोर व्यक्तींची स्मारके उभारण्याकरिता अनुदान (२५१५२४८६), ३१ सहायक अनुदान (योजनांतर्गत) या लेखाशिर्षांतर्गत प्राप्त अनुदानातून भागविण्यात यावा.

६. प्रस्तुत प्रकरणी वित्त विभाग, शासन निर्णय, क्रमांक-अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२४.०६.२०२१ मधील अटीं व शर्तीचे पालन करण्यात यावे.

७. हे आदेश वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक २४२/व्यय-१५ दिनांक २४.०३.२०२२ , अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०२२०३३०१५५०५४९७२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SUBHASH UTTAM RATHOD

Digitally signed by SUBHASH UTTAM RATHOD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4900ceadef378ce6953fc366d818c664ad0c54be36d6234bdc213e86d85816c2, pseudonym=BCD86FFD867AD43A7B590E9CD3A8BDBDCA27C96B, serialNumber=1C01985DAA2DB39DF76EF8C33C169711D61EA01A32C5E5CACFAE4CC6C6F928A2, cn=SUBHASH UTTAM RATHOD
Date: 2022.03.30 17:34:05 +05'30'

( सुभाष राठोड )
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.

२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई
३. मा.उप मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा.पालक मंत्री, कोल्हापूर जिल्हा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा.मंत्री/राज्यमंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा.विरोधी पक्ष नेता, विधान परिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
७. सर्व मा.विधान परिषद सदस्य / मा.विधानसभा सदस्य.
८. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई यांचे वरिष्ठ स्वीय सहायक.
९. मा.अ.मु.स.(ग्राम विकास विभाग), बांधकाम भवन, फोर्ट, मुंबई-१.
१०.मा.अ.मु.स.सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
११. मा.अ.मु.स.वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१२. मा.अ.मु.स.नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१३. मा.अ.मु.स.नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१४. सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१५. महालेखापाल (लेखा परिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
१६. विभागीय आयुक्त, आयुक्त कार्यालय, पुणे विभाग, पुणे.
१७. जिल्हाधिकारी, कोल्हापूर.
१८. जिल्हा नियोजन अधिकारी, कोल्हापूर
१९. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, कोल्हापूर.
२०. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, कोल्हापूर.
२१. जिल्हा कोषागार अधिकारी, कोल्हापूर
२२. सहायक जिल्हा नियोजन अधिकारी, कोल्हापूर.
२३. वित्त विभाग (व्यय -१५, अर्थसंकल्प-१६/१७), मंत्रालय, मुंबई.
२४. कक्ष अधिकारी, वित्त-१ कार्यासन, ग्राम विकास विभाग.
२५. निवड नस्ती (यो-११). ग्राम विकास विभाग.